**राज्यातील दुष्काळ/दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित केलेल्या तालुक्यांमध्ये/महसुली मंडळांमध्ये टंचाई निवारणार्थ राबविण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा उपाययोजनांकरिता पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०२४/प्र.क्र.५५/म-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१) महसुल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१७३/२०१७/म-७, दि.०७.१०.२०१७ व दि.२८.०६.२०१८

२) सम क्रमांकाचे शासन निर्णय दि. ३१.१० २०२३, दि.१०.११.२०२३ व दि.१६.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील तरतुदी व निकष विचारात घेऊन संदर्भ क्रमांक २ येथील दि.३१.१०.२०२३ च्या शासन निर्णयान्वये खरीप हंगाम, २०२३ करिता राज्यातील १५ जिल्हयातील ४० तालुक्यामध्ये दुष्काळ घोषित करण्यात आला आहे. या व्यतिरिक्त राज्यातील इतर तालुक्यातील कमी पर्जन्यमान झालेल्या एकूण १२४५ महसुली मंडळामध्ये संदर्भ क्र.२ येथील दि.१०.११.२०२३ व दि.१६.०२.२०२४ अन्वये दुष्काळसदृश्य परिस्थिती घोषित करून तेथे दुष्काळी तालुक्यांप्रमाणेच ८ सवलती लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. या ८ सवलतींपैकी "आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरवण्यासाठी टँकरचा वापर" ही एक सवलत दुष्काळी भागासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून राबविण्यात येते. सन २०२३-२४ या टंचाई कालावधीतील दुष्काळ घोषित केलेल्या तालुक्यांतील आणि दुष्काळसदृश्य परिस्थिती घोषित केलेल्या महसुली मंडळातील टंचाई निवारणार्थ राबविण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा उपाययोजनांकरिता पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने मागणी केल्याप्रमाणे रू.३,९७,०२,००,०००/- इतका निधी त्या विभागास उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः**

खरीप हंगाम, २०२३ करिता राज्यातील दुष्काळ घोषित केलेल्या १५ जिल्हयातील ४० तालुक्यांमध्ये व दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित केलेल्या १२४५ महसुली मंडळांमध्ये "आवश्यक तेथे पिण्याचे पाणी पुरवण्यासाठी टँकरचा वापर" ही सवलत राबविण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून टंचाई निवारणार्थ करण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा उपाययोजनांकरिता रु.३,९७,०२,००,०००/- (अक्षरी रूपये तीनशे सत्यान्नव कोटी दोन लक्ष) इतका निधी खाली नमूद लेखाशीर्षाखाली पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१) राज्यातील दुष्काळ घोषित केलेल्या १५ जिल्हयातील ४० तालुक्यांकरीता रु.६०,००,००,०००/- (रु. साठ कोटी फक्त) इतका निधी मागणी क्र सी-६, लेखाशिर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य ००, ०१,-अवर्षण, १०२,-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ००९३) अंतर्गत

(२) दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित केलेल्या १२४५ महसुली मंडळांकरीता रु.३,३७,०२,००,०००/-(रु. तीनशे सदतीस कोटी दोन लक्ष फक्त) एवढा निधी मागणी क्र सी-६, लेखाशिर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य-००; ०१,-अवर्षण, १०२,-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)(२२४५ २१८५) अंतर्गत

२. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

३. सदर निधी पाणी, पुरवठा व स्वच्छता विभागाने तात्काळ संबंधितांना वितरीत करावा. सदर निधी वितरीत करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी-शर्तीसह त्यात नमूद वित्तीय शिस्तीच्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. सदर निधी उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा. तसेच उपरोक्त निधीच्या मर्यादेतच खर्च होईल, याची दक्षता पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने घ्यावी. तसेच सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी त्यांचेकडे वर्ग करण्यात आलेल्या रकमांचा वेळोवळी महालेखाकार कार्यालयाशी ताळमेळ घेण्याची कार्यवाही करावी.

४. सदर निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे व नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी. तसेच वितरीत निधी चालु आर्थिक वर्षात खर्च करून झालेल्या खर्चाचा कोषागार व महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी त्रैमासिक ताळमेळ घेऊन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास तसेच या विभागास (म-७ व म-११) सादर करण्यात यावे.

५. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२८/२०२४/व्यय-९, दि.४.६.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८१४१३०८०८५६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.08.14 13:23:28 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
५) सर्व मा. विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य
६) मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२

९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-९/ अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.
१३) सह सचिव तथा वित्तिय सल्लागार, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन इमारत, मंत्रालय, मुंबई
१४) महसूल व वन विभाग, कार्यासन क्रमांक ब-१/म-३/म-११
१५) निवडनस्ती (कार्यासन म-७)